**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा कोहाणे, ता.अकोले, जि.अहमदनगर स्वच्छतागृह व इमारत दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शाआदु-२०१०/प्र.क्र.१४८/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०४ मार्च, २०१०.

**शासन निर्णय** : प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा कोहाणे, ता.अकोले, जि.अहमदनगर येथील स्वच्छतागृह व इमारत दुरुस्तीच्या अनुक्रमे रु.५,०२,१६४/- व रु.५,१२,२३९/- इतक्या रकमेच्या दोन अंदाजपत्रकांस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब विचाराधीन आहे.

२. सदर अंदाजपत्रक संबंधित शाखा अभियंता यांनी तयार केली उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, राजूर यांनी तपासली आहेत. तसेच मुख्याध्यापक, शासकीय माध्यमिक आश्रमशाळा, कोहाणे, प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर, उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, राजूर व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम, संगमनेर यांनी साक्षांकित केले आहे.

३. सदर अंदाजपत्रक सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित आहे. सदर काम दुरुस्तीचे असून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर यांचे कार्यक्षेत्रातील उपरोक्त शाळेच्या स्वच्छतागृह व इमारत दुरुस्तीच्या अनुक्रमे रु.५,०२,१६४/- (रुपये पाच लाख दोन हजार एकशे चौसष्ट फक्त) व रु.५,१२,२३९/- (रुपये पाच लाख बारा हजार दोनशे एकोणचाळीस फक्त) इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हीडीओ शुटींग करुन त्याची सी.डी.शासनास सादर करण्यात यावी.

५. सदर दुरुस्तीचा खर्च सन २००९-१० या वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

६. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७.     सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००३०४१६१८११००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( गी. मो. चांदे )
अवर सचिव

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अहमदनगर.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, संगमनेर.
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, राजूर.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.